साहित्य प्रतिष्ठान

मी प्रश्न ....

मी, मीच उत्तर.....

"ओंजळीत कधी,

मी कधी पानांवरती

कधी संथ मी,

कधी मी लाटांवरती

कधी डोळ्यांतुनी मी,

कधी श्वासातुनी झरतो,

ओघळतो गालांवरती"

वर्ष तिसरे, अंक १०४

: यजमान संपादक :
सचिन काकडे (मुंबई)

: मांडणी व सजावट :
मीनल चोगुले (सांगली)

: संपादक मंडळ :
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
शशिकांत रणवरे (ठाणे)
सारंग भणगे (पुणे)

हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी तसेच सूचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी
netaksharee@gmail.com

संपर्क
ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे . ४००६०४
९८६९६७४८२०

(हक्क आणि अधिकार)
सर्व हक्क त्या त्या कवींच्या स्वाधीन. यातील कोणत्याही कवितेचे पुनर्मुद्रण किंवा प्रकाशन करण्यापुर्वी त्या त्या कवीची लेखी परवानगी घेणे आवश्यक आहे.

# संपादकीय -

कधी माझ्यासाठी मीच प्रश्न
कधी माझ्यासाठी मीच उत्तर
कधी मी प्रश्न, कधी मी उत्तर
किती प्रश्न मी, कितीसा उत्तर ?

कधी चुकवले होते मीच मला
कधी शिकवले होते मीच मला
कधी प्रश्नासाठी, त्या प्रश्नापोटी
कधी बदलले होते मीच मला

कधी मी माझ्यातच सापडलो
कधी मी माझ्यातच अवघडलो
कधी उत्तरात मी इथे मी बडबडलो
कधी मी प्रश्नाआधीच गडबडलो

कधी देतो मी,कधी मागतो
कधी विचारतो, कधी सांगतो
कधी शोधतो मी,कधी लपवितो
कधी मी सुत्रांसकटच हरवितो

कधी उगाच मी इथे थांबतो
ओळी-ओळीत इथे मी लांबतो
पान मागचे मी उलटुन घेतो
अन,तिथं मी स्वतःलाच पाहतो

चुकतो कधी मी कधी बरोबर
कधी खोटं-खोटं कधी खरोखर
लेखणीतुनी मी खोल मनाच्या
कधी थेंब थेंब कधी येतो झरझर

मी माझे अक्षर मी सुत्र माझे
मी शब्द माझा हे मित्र माझे
आरंभ मीच ,मी अंत माझा
इथे प्रयोग मी,मीच पात्र माझे

शोध सुरु होता . . . .
आहे . . . .
आणि चालुच राहिल. . . .

-- सचिन काकडे, (मुबंई)

## -- कसा मी --

कधी असतो असा मी,
कधी असतो तसा मी
कळे ना माझंच मला
नेमका आहे कसा मी?

शिशिरातली पानगळ मी
वसंतातली पालवी मी
कळे ना माझंच मला
मृत्यु मी की जीवन मी

ग्रीष्माची दाहकता मी,
शरदाचं चांदणं मी
कळे ना माझंच मला
दाहक मी की शीतल मी

-- सुनील जोशी --
नागपूर

## -- मी --

मी तारका नभांगणी
मी तुळस तुझ्या अंगणी
शालीन हा स्वभाव परि
शूर मी रणांगणी

मी अवनी मी सरिता
मी पाखरू,मी कविता
मी गोडवा रसात
मी ऊब गारव्यात
मी शांत मुग्ध अन
मी मल्हार पावसात

मी ॐकार मी श्री
मी पालवी वनश्री
मी इवलासा जीव
मी पोकळ मी भरीव
मैफ़िलीत जर नसे मी
तर भासे उणीव

मी सुखदा मी स्वरदा
मी चण्डिका मी शारदा
चुकल्यास मी झुकेन
थकल्यास मी रूकेन
परि साध्य करेल ध्येय
तेव्हांच मालवेन
तेव्हांच मालवेन

-- अक्षदा --

## -- नि:शब्द मी --

नि:शब्द मी , निस्तब्ध मी
स्तब्धतेतील गुढ मी
नि:शब्द मी , शांत मी
शांततेतील वादळ मी

नि:शब्द मी,अस्थिर मी
स्थिरतेतील अस्थिरता मी
नि:शब्द मी,प्रशांत मी
अथांगेतील थांग मी

नि:शब्द मी,झंकार मी
झंकारातील सूर मी
नि:शब्द मी,ओढ मी
ओढीतील साद मी

नि:शब्द मी, नि:शब्द मी
शब्दाविनाच भाषा मी
नि:शब्द मी, नि:शब्द मी
नि:शब्दातील शब्द मी

नि:शब्द जरी शब्द माझे
शब्दाविनाच बोलतोय मी
जरी का नि:शब्दच मी
सये तुझ्या ह्रदयीचे स्पंदन मी

-- अमित डांगे –
पुणे

## -- मी वर्ज्य पंचम --

मी कोण?
मी एक कोडं गोंदलेलं
सुटणंही अशक्य
आणि पुसणंही अशक्य
मी अचल शुध्द

कोमल पर्याय तो नाहीच मला
माझ्याशिवाय तुलाही पर्याय नाहीच!
पण तरीही कळतंय मला,
तुझं मला टाळणं
आरोहात आणि अवरोहातही!
तुला काय वाटतयं?
तुझं मारवा आळवणं जीव घेतयं?
वेडी आहेस तू।।
अगं काळजाला भिडतय ते
माझं रितेपण माझ्यावर झालेला अन्याय
मी कोण?
अजूनही नाही कळालं
मी तोच तुझाच
वर्ज्य पंचम!

-- सुधिर मुळिक –
मुंबई

## -- मी --

मी प्रचंड
मी खंड
मी आकाश
मी भूखंड

मी संधी
मी विग्रह
मी नकोसा
कधी आग्रह

मी संक्षिप्त
मी विश्वव्याप्त
मी क्षार शुद्र
कधी समुद्र

मी वाद
मी संवाद
मी आसक्ती
कधी छळवाद

मी सान
मी अजाण
मी किरीट
कधी वहाण

मी युक्त हीन
जीणे नाही
मी विन जगणे
होणे नाही



-- संदेश --

## -- मी एक प्रवासी --

मी एक प्रवासी
आरंभापासून अंतापर्यंत
अंतापर्यंत अनंतापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
सुदृढतेपासून व्याधीपर्यंत
व्याधीच्याही आधीपर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
रागापासून लोभांपर्यंत
लोभापासून मोहापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
प्रेमापासून तिरस्कारापर्यंत
तिरस्कारापासून पुरस्कारापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
क्षणांपासून सनांपर्यंत
सनांपासून जीवनापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
स्थळापासून जलापर्यंत
जलापासून अंतराळापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
स्वप्नापासून सत्यापर्यंत
स्वप्नातल्या खोट्या पत्त्यापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
श्वासापासून प्राणापर्यंत
प्राणातल्या त्राणापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
सुखापासून दुःखापर्यंत
मुखापासून दुर्मुखांपर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
उष काळापासून अस्ताचलापर्यंत
संध्यापर्वापासून मध्यरात्रीपर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
जन्मापासून मरणापर्यंत
मरणापासून सरणापर्यंत

मी एक प्रवासी, मी एक प्रवासी
अंताला म्हणणारा प्रारंभ
आणी प्रारंभाला म्हणणारा सुखांत
मी एक प्रवासी, मी एक प्रवासी

-- निखील जोशी --

## -- मी शापित शब्द --

मी शापित शब्द
तु चंद्र आकाशीचा
मी डाग त्यास शोभेसा
तु फुल एक गुलकंदी
मी सुरवंट,फुलपाखरू मनिचा

तु अथांग सागर बेधुंद
मी वारा त्यास छळलेला
तु स्वच्छ सर अकल्पित
मी सूर्य त्यात न्हालेला

तु मधाळ पोळ जायबंदी
मी पहारेदार तुझ्या साम्राज्यीचा
तु हास्य आंनदी निमंत्रित
मी अश्रु न बोलावलेला

तु कोमल सुर मैफ़िलीचा
मी प्राण त्या कानीचा
तु राधा प्रत्येक मनीची
मी राधेय तू झिडकारलेला

तु अबोल पारिजात अंगणी
मी पहाट,प्रयत्न तव फुलविणारा
तु प्रकाश सूर्यसाक्षी
मी अंधार ठेचाळलेला
तु कविता गोड गुढ
मी शापित शब्द माळलेला



-- विनय शिवहरी विरखिरे --

# -- मी आणि मी --

मी आणि मी

मी आणि मी

पाऊस असून भिजत नाही

भूक असून जेवत नाही

झोप असून झोपत नाही

दोस्त असून भेटत नाही

रंग असून चित्र नाही

शब्द असून कविता नाही

मी असून माझ्यातला मी नाही

-- वसंत ढोबळे- आजोबा --

## -- मी आणि "मी" --

श्वासांच्याही आत खोलवर
ह्रदयाच्या ठोक्यांना लंघून
एक अनोखा देश पर्यांचा
तिथे खरी मी राहते आहे
श्वासाना मी कधी विसरते
ह्रदयाच्या तारांवर वसते
नाही कुणी ऐकू शकले त्या
स्पंदनेशी मी खरी मी असते
आणि साहते तणाव,झगडे
माझ्यातून मी निखळून पडते
ह्या श्वासांच्या देशी राहून
स्वत्व अनोखे अखंड झुरते
माझ्याविन जगते फ़सते
बंधन पेलत वरवर हसते
त्या देशीच्या अस्तित्वाची
याद इथे मी घेऊन फ़िरते

-- प्रभा प्रभुदेसाई --

## -- मी केंद्रबिंदू आकाशगंगेचा --

ना मी पूर्वेचा ना पश्चिमेचा
माझा प्रवास दाही दिशेचा
ना मी उत्तरेचा न दक्षिणेचा
मी केंद्रबिंदू आकाशगंगेचा
ना मी धरतीचा ना आभाळाचा
मी चुंबक त्या क्षितिजरेषेचा
ना मी गर्भातला ना सरणावरचा
मी आत्मा शरीरातल्या गणवेशाचा
ना मी भावनांचा ना विचारांचा
मी खेळ खंडोबा तुमच्या कल्पनांचा
ना मी आजचा ना कालचा
मी एक दुवा हरेक काळांचा
ना मी आशेचा ना निराशेचा
मी तर भो तुमच्या कर्माचा
ना मी ह्या जातीच ना त्या जातीचा
मी तर इतिहास मनुष्य धर्माचा
ना मी भरतीचा ना ओहोटीचा
मी शांतता सागराच्या खोल पातळीतली
ना मी आगीचा ना मी धूरांचा
मी ज्वालामुखी पृथ्वीच्या पोटातली
ना मी अमका ना मी तमका
मी तर श्वास प्रत्येक मनांचा
ना मी चंद्राचा ना चांदण्यांचा
मी जगतो ते भारावलेल्या क्षणांचा



-- सनिल पांगे –

# -- राधा मी --

राधा मी,सखी मी,प्राप्ती मी मोक्षाची
राधा मी,भक्ती मी,शक्ती मी क्रुष्णाची

चंद्रमुखी मी,पौर्णिमा,चकोर चकित सुनैना मी
अमृते मुखकमल धुवूनी दशदिशा उजळिते मी
राधा मी

दामिनी मी,चपला,चक्रधारीच आव्हान मी
रागे भरता दिनकरावर,ब्रम्हाची नवसृष्टी मी
राधा मी

रासेश्वरी मी,सुंदरा,रसिक शिरोमणीची रती मी
उत्कट,निर्मल,आत्मिक प्रेमाची व्याख्या मी
राधा मी

वियोगिनी मी,विरहा,पुरुषोत्तमाची पूजक मी
दिली बन्सी मुरलीधराने जिस ती भाग्यश्री मी
राधा मी

प्रिया मी,अप्सरा,जगन्नाथ तो वैश्विक,अणू मी
देहोत्सर्गी कृ ष्ण हृदयी विराजित एकमेव कृष्ण मी

राधा मी,सखी मी,प्रप्ती मी मोक्षाची
राधा मी,भक्ती मी,शक्ती मी कृष्णाची

-- स्वप्ना कोल्हे --

# -- मी एक स्त्री --

मी एक स्वप्न.... अपूर्ण
पहाटे विस्कटणारं तुटणारं
तरीही रोज रात्री
डोळयाच्या बंद कुपीत उघडणारं
मी एक स्वप्न.... अपूर्ण

मी एक मर्यादा.... अमर्यादित
स्वतःच क्षितीज स्वतःच ठरवणारी
तरीही आखलेल्या चौकटीत रमणारी
मी एक मर्यादा.... अमर्यादित

मी एक आक्रोश.... संयमी
किंचाळणारी तडफ़डणारी
तरीही अविचल तटस्थ उभी अशी
मी एक आक्रोश.... संयमी

मी एक शांतता.... बोलकी
अखंड निरव पसरलेली
तरीही स्वतःची
प्रत्येक भावना सांगणारी
मी एक शांतता.... बोलकी

मी एक भिती.... धाडसी
घाबरणारी थरथर कापणारी
तरीही धैर्याने स्वतःवर मात करणारी
मी एक भिती.... धाडसी

मी एक कोडं.... मलाच पडलेलं
गुंतलेलं,कधी ही न उलगडलेलं
तरीही सुटण्यासाठी रोज उत्सुक असलेलं
मी एक कोडं.... मलाच पडलेलं

मी एक वेदना.... हवीहवीशी
काळजाला पीळ देणारी रडवणारी
तरीही तृप्त करणारी स्वर्गीय
मी एक वेदना.... हवीहवीशी

मी एक प्रतिबिंब.... माझंच
पाण्यात तरंग पडताच लुप्त होणारं
तरीही पुन्हा कुठेतरी कधीतरी
मलाच गवसलेलं
मी एक प्रतिबिंब.... माझंच

मी एक कविता.... अव्यक्त
न कळलेली न उमजलेली
तरीही मनात खोल रुजलेली बहरलेली
मी एक कविता.... अव्यक्त

मी...
मी एक स्त्री....
संपूर्ण, संतुष्ट, स्वंयभू
मी एक स्त्री !

-- भारती सरमळकर --

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे. दर वेळी येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतोच. याच प्रोत्साहनाच्या बळावर आपण शतक गाठले आणि पुढला प्रवास अधिक जोशाने होत जाईल. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरित केला जातो. या व्यतिरिक्त जुने अंक पहाण्यासाठी www.esahity.com या वेबसाईटवर व्हिजिटणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे. हे अंक आपण आपल्या ईष्ट मित्रांना फ़ॉरवर्ड करून त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करून घ्यावे. त्याच मेलची cc आम्हाला (netaksharee@gmail.com} दिल्यास आम्ही पुढचे अंक त्यांना विनामूल्य पाठवत राहू. मराठीची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यात आपलाही हातभार लागावा असे कोणाला नाही वाटणार ? आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचा पल्ला पार करील हा विश्वास आहे.

--------

## : ई साहित्य प्रतिष्ठानची इतर प्रकाशने :

विनोदाचा दादा : **ई स्टाप,** कवितांचा आवाज : स्वरनेटाक्षरी अल्बम,

मुलांचा नेट प्रवेश : बालनेटाक्षरी, महाराष्ट्राचं वैभव : दुर्ग दुर्गट भारी

--------

## : ई पुस्तके :

ओथंब, मोरया, चार क्षण, सईची वही, लोकल गोष्टी, प्रियेचे अभंग, तो आणि ती, टल्लीची शाळा, अहम् ब्रह्मास्मि, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, मकरंदच्या त्रिवेण्या, मीरा (मराठी अनुवाद), सावळ्या मुलीची गाणी, देशी दारूचे दुकान (3D), मराठी कसे लिहावे (ई शाळा),तो मी आणि सिगारेट, ओथंब २, एक होते राजे, लालनाक्या, आरंभ : एक नवी वाटचाल, ई बुक कसे बनते (ई शाळा), निरोप.

वरील ई पुस्तके विनामूल्य मिळण्यासाठी, सूचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठवण्याकरिता

**संपर्क : esahity@gmail.com**

--------

नेटाक्षरीचा अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना , अभिप्राय, स्वतःच्या कविता पाठवण्यासाठी : **संपर्क :**

**netaksharee@gmail.com**

--------

नेटाक्षरीच्या भावी थीम्स : घुंगरांच्या तालावर (लावणी), भेटीच्या कविता

--------

ई साहित्य प्रतिष्ठानची आजवरची १३६ प्रकाशने सीडीवर उपलब्ध आहेत.

**“ शतकोत्सव : ५० रुपयांत १३६ पुस्तके”**

**संपर्क : 9869674820**

अधिक माहितीसाठी भेट द्या

**: www.esahity.com :**